केंद्र शासन पुरस्कृत
"नागरी सुधारणा प्रोत्साहन निधी"
या योजनेच्या अंमलबजावणीबाबत....

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक युरिफ १०२००४/५८१/प्र.क्र.८१/०४/नवि-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- २ ऑगस्ट, २००४

**संदर्भ :-** १) भारत सरकार, शहरी विकास व दारिद्रय निर्मूलन मंत्रालय यांचे पत्र क्रमांक १-११०११/४२/२००२/एच-२, दिनांक ३१/१०/२००३
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक एचएसजी २००३ /प्र.क्र.४ /गृनिधो , दिनांक १९ सप्टेंबर २००२ चा

**प्रस्तावना :--** केंद्र शासनाने सन २००२-२००३ चा अर्थसंकल्प सादर करताना "नागरी सुधारणा प्रोत्साहन निधी" (URIF) या नावाची योजना घोषित केली आहे. देशातील नागरी जनतेला चांगल्या प्रतीच्या नागरी सुविधा उपलब्ध होण्यासाठी काही क्षेत्रात सुधारणा करणे आवश्यक असून या सुधारणा हाती घेण्यासाठी राज्यांना प्रोत्साहन मिळावे हा या योजनेचा मुख्य उद्देश आहे.

सदर योजने संदर्भातील केंद्र शासनाची मार्गदर्शक तत्वे संदर्भाधिन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केली आहेत. केंद्र शासनाच्या सूचनेनुसार राज्य सरकारने खालील सात क्षेत्रांमध्ये सुधारणा हाती घेणे आवश्यक आहे.

(१) नागरी जमिन कमाल धारण अधिनियम निरसीत करणे
(२) मुद्रांक शुल्क आकारणीचे सुसूत्रिकरण
(३) भाडे नियंत्रण कायद्यात सुधारणा
(४) नोंदणी विभागाचे संगणकीकरण
(५) मालमत्ता कर आकारणी प्रणालीमध्ये सुधारणा
(६) उपभोक्ता आकारणी सुरु करणे
(७) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये लेखांकनकरिता व्दिनोंद पध्दती सुरु करणे

केंद्र शासनाच्या सूचनेप्रमाणे उपरोक्त क्षेत्रात सुधारणा हाती घेण्याकरिता राज्य शासनाने केंद्र शासनाबरोबर करारनामा केला आहे. **सदर योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून त्यासाठी पूर्णपणे केंद्रीय अनुदान प्राप्त होणार आहे.** नागरी सुधारणा प्रोत्साहन निधी अंतर्गत प्राप्त केंद्रीय अनुदानाच्या विनियोगाची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**(१) वितरण विषयक कार्यपध्दती :-**

नागरी सुधारण प्रात्साहन निधी " या योजनेअंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्रीय अनुदानाचे राज्यातील प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय वाटप खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | निधी वितरण ( प्रत्येक नपा प्रमाणे ) |
|---|---|---|
| १ | "अ" वर्ग नगरपरिषदा | रु. ५०,००,००० /- |
| २ | "ब" वर्ग नगरपरिषदा | रु. ३०,००,००० /- |
| ३ | "क" वर्ग नगरपरिषदा | रु. ३०,००,००० /- |
| ४ | नगरपंचायती | रू. ५५,००,००० /- |

**(२) योजनेअंतर्गत अनुज्ञेय कामे :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार या योजनेअंतर्गत खालील कामे अनुज्ञेय आहेत.

१) गृहनिर्माण

२) नगर विकास

३) दारिद्र निर्मूलन

**प्रत्येक घटकासाठी एकूण प्राप्त अनुदानाच्या किमान १/४ रक्कम खर्च करण्यात यावी.** तसेच प्राप्त निधीपैकी पाच टक्के निधी हा संबंधित नगरपरिषदेने प्रशासकीय सुधारणेसाठी (नगरपरिषदांचे संगणकीकरण, मालमत्ता कराच्या वसुलीमध्ये सुधारणा करणे, उपभोक्ता कराची आकारणी करणे, द्विनोंद लेखांकन पध्दती सुरू करणे, वगैरे) वापरण्यात यावा.

**(२.१) गृहनिर्माण :** या घटकाअंतर्गत गृहनिर्माण विभागाच्या वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेच्या धर्तीवर नगरपरिषदांनी घरकूल योजना तयार करावी. वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेअंतर्गत ज्या नगरपरिषदांना अनुदान देय आहे त्या नगरपरिषदा वगळून इतर नगरपरिषदांमध्ये ही योजना राबविण्यात यावी. सोबत वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेचा संदर्भाधिन क्र. २ चा शासन निर्णय जोडला आहे. कृपया त्याचे अवलोकन करावे. तसेच सदर योजनेची ठळक वैशिष्ठे सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मध्ये पहावीत.

**(२.२) नगर विकास :**

सध्या शासनाकडून देण्यात येणारे रस्ता अनुदान हे पुरेसे नसल्याने त्यास पूरक म्हणून शहरातील रस्ते , गटार बांधणे तसेच सुलभ शौचालय बांधणे ही कामे नगर विकास अंतर्गत घेण्यात यावीत.

**(२.३) दारिद्र निर्मूलन :** या अंतर्गत नगरपरिषदांनी शॉपिंग कॉम्प्लेक्स बांधून ती सुशिक्षित बेरोजगारांना भाडेतत्वावर चालविण्यास दयावीत.

(२.४) त्याचप्रमाणे राज्यातील नगरपरिषदांनी नियोजनबध्द वसुली व्यवस्थापनाद्वारे मालमत्ता कर व पाणीपट्टी जास्तीत जास्त वसूल करून तसेच उत्पन्नाचा नवीन स्त्रोत निर्माण करून (उदा. उपभोक्ता कर) आर्थिक दृष्टया सक्षम होणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेवून नगरपरिषदांना पुढील अनुदान वितरित करण्यापूर्वी ज्या नगरपरिषदांची/ नगरपंचायतीची मालमत्ता कर व पाणीपट्टी यांची वसूली ८०% पेक्षा जास्त आहे, अशाच नगरपरिषदा/ नगरपंचायती अनुदानास पूर्णपणे पात्र रहातील. वसूलीचे प्रमाण ८०% पेक्षा कमी असलेल्या नगरपरिषदा /नगरपंचायती अशंतः पात्र राहातील. व ज्यांची वसूल ५०% पेक्षा कमी वसूल आहे, अशा नगरपरिषदा /नगरपंचायती या योजने अंतर्गत पुढील अनुदानास पात्र राहाणार नाहीत.

(३) **अंमलबजावणीची कार्यपध्दती :**

"नागरी सुधारणा प्रोत्साहन निधी" या योजनेअंतर्गत प्राप्त केंद्रीय अनुदानाचा विनियोग करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी खालील प्रमाणे विहित केलेली कार्यपध्दती अंमलात आणणे आवश्यक आहे.

(३.१) **प्रस्ताव सादर करण्याची कार्यपध्दती :**

या योजनेअंतर्गत निधीच्या मागणीसाठी प्रस्ताव सादर करण्यापूर्वी प्रस्तावित कामांची "निवड" व "निश्चिती" करणे तसेच लाभार्थ्यांची निवड करण्याची जबाबदारी जिल्हास्तरीय समितीकडे सोपविण्यात येत आहे.

(३.२) **जिल्हास्तरीय समिती :**

योजनेच्या प्रस्तावांना मान्यता देण्यासाठी तसेच योजनेच्या अंमलबजावणीवर नियंत्रण ठेवण्यासाठी खालील प्रमाणे समिती स्थापन करण्यात यावी.

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| संबंधित नगरपालिकेचे अध्यक्ष | सदस्य |
| सहायक संचालक, नगररचना | सदस्य |
| मुख्याधिकारी, नगरपालिका | सदस्य-सचिव |
| म्हाडाचा स्थानिक जिल्हा गृहनिर्माण अधिकारी | सदस्य (गृहनिर्माण घटकासाठी.) |

(३.३) **जिल्हा स्तरावर सनियंत्रण व प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणे :**

या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे या योजनेच्या सनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यांत येत आहे. त्यांनी या योजनेअंतर्गत नगरपरिषदांना वितरित करण्यात आलेल्या निधीचा विनियोग विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन विहित कामांसाठीच होईल याची खबरदारी घ्यावी. जिल्हाधिकारी यांनी जिल्हास्तरीय समितीने सादर केलेल्या प्रस्तावास एक महिन्याचे आत प्रशासकीय मान्यता दयावी. प्रशासकीय मंजूरी देताना खालील बाबी तपासून पहाव्यात.

(३.३.१) प्रस्तावित कामांची निवड व निश्चिती करणेबाबत जिल्हास्तरीय समितीचा ठराव

(३.३.२) प्रस्तावित कामांना सक्षम प्राधिका-यांकडून तांत्रिक मंजरीच्या आदेशाची प्रत

(३.३.३) शासनाच्या इतर योजनेतून अर्थसहाय्य न घेतल्याचे प्रमाणपत्र

(३.३.४) यापूर्वी वितरित निधीचे विनियोग प्रमाणपत्र

(३.३.५) ज्या जागेवर काम सुरु करण्याचे प्रस्तावित केले आहे ती जागा नागरी संस्थेच्या मालकीची असल्याचे प्रमाणपत्र

(३.३.६) गृहनिर्माण घटकाखाली ज्या नगरपरिषदांना निधी खर्च करावयाचा आहे , अशा नगरपरिषदांनी त्यांना वाल्मिकी आवास योजनेअंतर्गत , गृहनिर्माण विभागाकडून निधी प्राप्त न झाल्याचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी जिल्हाधिकारी यांचेकडून प्रशासकीय मंजुरी प्राप्त होताच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन तातडीने अनुदानाचा विनियोग करावा.

## (४) <u>निधी वितरण विषयक कार्यपध्दती :</u>

या योजनेअंतर्गत वितरित करण्यात आलेला निधी नगरपरिषदांच्या बाबतीत नगरपरिषद मुख्याधिकारी, नगरपरिषद अध्यक्ष व जिल्हाधिकारी अथवा त्यांचे प्रतिनिधी यांच्या संयुक्त नावे उघडण्यात आलेल्या एकाच "राष्ट्रीयकृत बँक" **बचत खात्यावर** जमा करावा. नगरपरिषदांनी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन त्यास जिल्हास्तरीय समितीची प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतरच उक्त बँक खात्यातील रकमेचा प्रत्यक्ष कामाच्या प्रगतीनुसार विनियोग करावयाचा आहे.

या केंद्रीय निधीचा विनियोग विहित प्रयोजनासाठीच शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार होत आहे, हे पहाण्याची प्राथमिक जबाबदारी संबंधित नगरपरिषदेचे मुख्याधिकारी यांची असेल. या प्रकरणी कोणतीही अनियमितता झाल्यास संबंधित मुख्याधिकारी यांना जबाबदार धरण्यात येऊन त्यांचेविरुंध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही शासनाकडून प्रस्तावित करण्यांत येईल.

या योजनेंतर्गत निधीचा विनियोग करताना नगरपरिषदांच्या बाबतीत धनादेशावर मुख्याधिकारी, अध्यक्ष व जिल्हाधिकारी अथवा त्यांचे प्रतिनिधी या तिघांपैकी कोणत्याही दोन व्यक्तींची स्वाक्षरी आवश्यक राहील.

## (५) <u>विनियोग प्रमाणपत्र विहित मुदतीत सादर करणे :</u>

**(५.१)** या योजनेंतर्गत **प्राप्त झालेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र नऊ महिन्यात** जिल्हाधिकारी यांचेकडे सादर करणे बंधनकारक आहे. जिल्हाधिकारी यांनी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरित केलेल्या निधीचा विहित कालमर्यादेमध्ये विनियोग होण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना व पूर्व तयारी करावी. ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्था त्यांना वितरित केंद्रीय निधीचा विहित कालमर्यादेमध्ये विनियोग करुन विनियोग प्रमाणपत्रे शासनास सादर करणार नाहीत, अशा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय असलेले पुढील वर्षाचे अनुदान राज्यातील इतर गरजू नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्याच आर्थिक वर्षाच्या अखेरीस वितरित करण्यात येईल याची देखील संबंधितांनी कृपया नोंद घ्यावी. यामुळे एखाद्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस या योजनेच्या

पुढील अनुदानापासून भविष्यात वंचित रहावे लागल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी संस्थेचीच असेल याची देखील नोंद घ्यावी.

(५.२) शासनाने विहित केलेल्या उपरोक्त कार्यपध्दतीचे सर्व सबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे. हा शासन निर्णय नागरी संस्थांच्या सर्वसाधारण सभेसमोर ठेवावा व आवश्यक नोंद कार्यवृत्तांतात घ्यावी.

सदरहू शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ३००/१४७४, दिनांक १४ जुलै २००४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ४५१/व्यव-३, दिनांक २१ जुलै २००४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

**( फ. ब. खान )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास ) यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६) अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७) प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
८) संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा इमारत, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई-४०० ०२५
९) महालेखापाल, (लेखापरीक्षण)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१०) महालेखापाल, (लेखापरीक्षण)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
११) संचालक , लेखा व कोषागार, मुबई
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३) संचालक नगररचना, पुणे
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सर्व जिल्हे.
१७) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
१८) प्रधान सचिव-(१) व (२), नगर विकास विभाग, मंत्रालय ,यांचे स्वीय सहाय्यक
१९) सर्व सह सचिव/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२०) निवड नस्ती, नवि-४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

# परिशिष्ट "अ"

**गृहनिर्माण :** या घटकांतर्गत (अ) घरकूल उभारणे (ब) घरकुलाच्या ठिकाणी जागा विकसित करणे या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात यावा.

## (अ) घरकुल उभारणी :

**(१) पात्रता :** नगरपालिकेमध्ये किमान ५ वर्षे वास्तव्य करीत असणारे अनुसूचित जाती/जमातीच्या प्रवर्गातील कुटुंबे तसेच आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील बिगर अनुसूचित जाती/जमातीची कुटुंब

**(२) घराचे क्षेत्र :** जागेच्या उपलब्धतेनुसार घराचे क्षेत्र जास्तीत जास्त २२५ चौ.फूट इतके ठेवण्यांत यावे.

**(३) घराचा बांधकाम खर्च :** योजनेंतर्गत घराच्या बांधकामाचा खर्च हा जास्तीत जास्त रु.५०,०००/- पर्यन्त असावा.

**(४) योजनेचे अंमलबजावणी क्षेत्र :** घोषित/अघोषित झोपडपट्टी वा रहिवास करण्यासाठा अयोग्य असलेल्या व दाटीवाटीने रहाणा-या सुमारे ३०० लोकसंख्या (६० ते ७० घरांच्या कच्च्या बांधकामाची वसाहत) असलेल्या वसाहतीसाठी ही योजना घेता येईल.

**(५) जमिनीचा पट्टा :** घरासाठीची जमीन ही शासकीय जमीन, नगरपरिषदेची जमीन अथवा लाभार्थी सध्या ज्या ठिकाणी रहात असेल ती जमीन लाभार्थ्याला देण्यात यावी. प्रामुख्याने कुटुंबातील स्त्री व्यक्तीच्या नावे जमिनीचा पट्टा देण्यात येईल.

**(६) निधीची उपलब्धता :** सदर योजनेसाठी संपूर्णपणे केंद्र शासनाचा निधी अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येईल.

**(ब) घरकुलासाठी जमिन विकसित करणे :** योजनेंतर्गत बांधल्या जाणा-या घरांना पायाभूत सुविधा जसे पाणी, वीज, मलनि:सारण आणि रस्ते इत्यादी सुविधा या योजनेखाली उपलब्ध होणा-या निधीतून पुरविण्यात याव्यात